महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या उच्चाधिकार समितीचे सदस्य सचिव म्हणून संचालक, पर्यटन संचालनालय यांची नियुक्ती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टिडीएस-२०१७/८/प्र.क्र.७८४ (भाग-२)/ पर्यटन**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: २२ नोव्हेंबर, २०१९

**वाचा :-**

१) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्रमांक, टीडीएस-२०१५/११/प्र.क्र.१०२१/पर्यटन, दि.४.५.२०१६,
२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्रमांक, टीडीसी-२०१७/८/प्र.क्र.७८४/पर्यटन, दि.४.८.२०१७
३) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्रमांक, टीडीएस-२०१९/प्र.क्र.१९७/पर्यटन, दि.१९.३.२०१९
४) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्रमांक, टीडीसी-२०१९/३/प्र.क्र.२२४/पर्यटन, दि.२.४.२०१९

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ मध्ये पर्यटन प्रकल्पांना वित्तीय प्रोत्साहने देऊ करण्यात आलेली आहेत. महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ च्या परिच्छेद ६ अनुसार पर्यटन प्रकल्पांना Mega Project Unit व Ultra Mega Project Unit म्हणून मान्यता देण्यासाठी, अधिक प्रोत्साहने / सवलती मंजूर करण्यासाठी आणि अटी व शर्तीमध्ये सूट देण्यासाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयाद्वारे पुढीलप्रमाणे उच्चाधिकार समितीची स्थापना करण्यात आलेली आहे.

**महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ अंतर्गत उच्चाधिकार समिती**

| | | |
|---|---|---|
| १. | मा. मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, वित्त | सदस्य |
| ३. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, नियोजन | सदस्य |
| ४. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,महसूल | सदस्य |
| ५. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, नगर विकास | सदस्य |
| ६. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,उद्योग | सदस्य |
| ७. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,ऊर्जा | सदस्य |
| ८. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,सार्वजनिक बांधकाम | सदस्य |
| ९. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,पर्यटन , | सदस्य |
| १०. | उद्योग आयुक्त ,उद्योग संचालनालय ,महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| ११. | व्यवस्थापकीय संचालक ,महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ ,मुंबई | सदस्य सचिव |

२. आता संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयाद्वारे श्री. डी.बी.गावडे, भा.प्र.से. यांची पर्यटन विभागांतर्गत पर्यटन संचालनालयाच्या आस्थापनेवरील संचालक, पर्यटन संचालनालय या पदावर नियुक्ती करण्यात आली असून संदर्भ क्र. ४ येथील शासन परिपत्रकाद्वारे पर्यटन संचालनालय व महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ यांच्यामधील कामाच्या वाटपाबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले असून त्यानुसार पर्यटन धोरण २०१६ च्या अंमलबजावणीचे काम पर्यटन

संचालनालयाकडे सोपविण्यात आले आहे. त्यामुळे संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयाद्वारे मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या उच्चाधिकार समितीचे सदस्य सचिव म्हणून व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ यांच्या ऐवजी संचालक, पर्यटन संचालनालय यांची या शासन निर्णयाद्वारे नियुक्ती करण्यात येत आहे. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई हे सदर समितीचे सदस्य म्हणून यापुढेही कायम राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२०३१२२५०२२९२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Ramesh Jayaram Kadam
Date: 2019.12.03 12:29:28 +05'30'

**( र.ज.कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक,
३. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
वित्त / नियोजन / महसूल / नगर विकास-१/उद्योग/ ऊर्जा / सार्वजनिक बांधकाम / पर्यटन
४. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
७. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र
८. उद्योग आयुक्त, उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य,
९. सर्व प्रादेशिक उपसंचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य,
१०. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागातील सर्व कार्यासने,
११. निवड नस्ती.